




महाराष्ट्र शासन
सामान्य प्रशासन विभाग,
मंत्रालय (विस्तार), दालन क्र.५५७, ५ वा मजला,
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मुंबई-४०० ०३२.

दूरध्वनी क्रमांक-२२७९३३४४ Email ID : desk१४gad-mh@gov.in

.......................................................................................................................

क्रमांक: प्रतिनि-२०२३/प्र.क्र.५०/का.१४ दिनांक : ०६/०३/२०२३

प्रति,

सह /उप सचिव,
सर्व मंत्रालयीन विभाग (आस्थापना),
मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२.

विषय : महाराष्ट्र स्थावर संपदा नियामक प्राधिकरण व अपिलीय न्यायाधिकरणावरील पदे प्रतिनियुक्तीने भरणेबाबत..
मंत्रालयीन सह/उप सचिव व अवर सचिव यांच्याकडून इच्छुक्ता मागविण्याबाबत.

महोदय/ महोदया,

महाराष्ट्र स्थावर संपदा नियामक प्राधिकरण व महाराष्ट्र स्थावर संपदा अपिलीय न्यायाधिकरणावर खालील पदे मंत्रालयीन सह/उप सचिव व अवर सचिव संवर्गातील अधिकाऱ्यांमधून प्रतिनियुक्तीने भरावयाची आहेत.

| अ. क्र. | नियामक प्राधिकरण व अपिलिय न्यायाधिकरणावरील पदाचे नाव कार्यालय | आवश्यक पद | पदसंख्या |
|---|---|---|---|
| १ | अ) सचिव, महाराष्ट्र स्थावर संपदा नियामक प्राधिकरण, हाऊसफीन भवन, प्लॉट नं. सी-२१, ई-ब्लॉक, वांद्रे-कुर्ला कॉम्प्लेक्स, वांद्रे (पूर्व) मुंबई-५१ | मंत्रालयीन संवर्गातील सहसचिव/उप सचिव | २ |
| | ब) प्रबंधक, महाराष्ट्र स्थावर संपदा अपिलीय न्यायाधिकरण, पहिला मजला, वन फोर्ब्ज बिल्डींग, थापर हाऊस, डॉ.व्हि.बी.गांधी रोड, काळा घोडा, फोर्ट, मुंबई-०१ | | |
| २ | प्रशासकीय अधिकारी/अवर सचिव | अवर सचिव, मंत्रालयीन संवर्ग | १ |

२. त्यानुषंगाने सर्व मंत्रालयीन प्रशासकीय विभागांना विनंती करण्यात येते की, महाराष्ट्र स्थावर संपदा नियामक प्राधिकरण व महाराष्ट्र स्थावर संपदा अपिलीय न्यायाधिकरणावर उपरोक्त पदे मंत्रालयीन सह सचिव/उप सचिव व अवर सचिव संवर्गातील अधिकाऱ्यांमधून प्रतिनियुक्तीने जाण्यासाठी इच्छुक असलेल्या आपल्या विभागातील सह सचिव/उप सचिव व अवर सचिव यांची नावे, त्यांचे मागील पाच वर्षांच्या गोपनीय अहवालांच्या प्रमाणित प्रतींसह, वैयक्तिक माहिती (Bio-data), संपूर्ण सेवा तपशील (कालावधी, विभाग, पद), ना-विभागीय चौकशीचे प्रमाणपत्र व विभागाचे ना-हरकत प्रमाणपत्र इत्यादी माहिती या विभागाकडे विवरणपत्र-ब मध्ये भरून दि.१७.०४.२०२३ पर्यंत निश्चितपणे प्राप्त होतील अशा रितीने पाठविण्यात यावी.

३. उपरोक्त पदासाठी प्रतिनियुक्तीवर जाण्यास इच्छुक असलेल्या मंत्रालयीन संवर्गातील सह सचिव/उप सचिव व अवर सचिव यांनी परस्पर या विभागाकडे अर्ज सादर करू नयेत. त्यांनी आपआपल्या विभागास अर्ज सादर करावेत. परस्पर अर्ज सादर केल्यास त्या अर्जाचा विचार करण्यात येणार नाही व त्याबाबत संबंधितांस काहीही उत्तर कळविण्यात येणार नाही. तसेच मंत्रालयीन विभागांनी कोणीही अधिकारी इच्छुक नसल्यास निरंक असेही या विभागास कळवावे, ही विनंती.

४. सदर पत्राची प्रत महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आली असून त्याचा संगणक संकेतांक २०२३०४०६१३०२१५०९०७ असा आहे. सदर पत्र डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

**आपला,**

VINAYAK BABURAO MANE

Digitally signed by VINAYAK BABURAO MANE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=GENERAL ADMINISTRATION DEPARTMENT, 2.5.4.20=62086e8da42b80ce1e183d1e9775b63142b6a94941d6fa6ffe12c2ad5c605c23, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=174004518DCF8ACA2F592B0E3D867D519F7D7899F468EBFB7A997070682C9983, cn=VINAYAK BABURAO MANE
Date: 2023.04.06 13:07:12 +05'30'

**(वि.बा.माने)**

**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**सोबत : विवरणपत्र**

**प्रत-** निवडनस्ती सा.प्र.वि./कार्यासन-१४

**विवरणपत्र**

| अ.क्र. | मुद्दा | तपशिल/अभिप्राय |
|---|---|---|
| १ | अधिकारी/ कर्मचाऱ्यांचे संपूर्ण नाव | |
| २ | जन्मदिनांक | |
| ३ | शैक्षणिक अर्हता | |
| ४ | स्थायित्व प्रमाणपत्र | |
| ५ | भ्रमणध्वनी क्रमांक | |
| ६ | मागील ५ वर्षाच्या गोपनीय अहवालाच्या छायाप्रती (मूळ गोपनीय अहवाल पाठवू नयेत.) | |
| ७ | मत्ता व दायित्वे सादर केली आहेत का? | |
| ८ | ५०/५५ व्या वर्षी पुनर्विलोकन केले आहे का? (लागू असल्यास) | |
| ९ | संबंधित अधिकाऱ्याला यापूर्वी प्रतिनियुक्ती दिली असल्यास तपशील (पद व कालावधी) (प्रतिनियुक्तीचा एकूण कालावधी १० वर्षापेक्षा जास्त नसावा) | दिनांकापासून ते दिनांकापर्यंत \| पद /प्रतिनियुक्तीचे ठिकाण<br>एकूण कालावधी |
| १० | मागील प्रतिनियुक्तीवरून परत आल्याच्या दिनांकापासून ३ वर्षे पूर्ण झाली आहेत का? | |
| ११ | संबंधित अधिकाऱ्यांविरूध्द विभागीय चौकशी सुरू अथवा प्रस्तावित आहे काय? | |
| १२ | प्रतिनियुक्तीकरीता निवड झाल्यास विभाग कार्यमुक्त करेल किंवा कसे. | |